गुणवत्तेवर निवड झालेल्या मागासवर्गीयांच्या गटातील उमेदवारांना आरक्षित असलेल्या जागांच्या संदर्भात मोजण्यात येवू नये याबाबतचा खुलासा...

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: बीसीसी-१०८९/२५५१[ब]/१६-ब,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २५ जानेवारी, १९९१.

वाचा :- [१] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक-बीसीसी-१०६४/३/जे, दिनांक ९ एप्रिल, १९६५.

[२] शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: बीसीसी-१०६४/३/जे, दिनांक २७ जून, १९७४.

## निर्णय

उपरोक्त शासन निर्णयांमध्ये असे सूचित केले आहे की, मागासवर्गीयांच्या गटातील ज्या उमेदवारांची गुणवत्तेनुसार निवड होईल त्यांना आरक्षित जागांच्या संदर्भात मोजण्यात येवू नये. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, सदरील आदेशांची अंमलबजावणी काटेकोरपणे केली जात नाही व मागासवर्गीयांच्या गटातील उमेदवार गुणवत्तेनुसार [मेरीट] निवडले गेले असले तरी त्यांना राखीव असलेल्या जागांच्या संदर्भातच नेमणुका देण्यात येतात.

२. उपरोक्त आदेशांचा याव्दारे पुनरुच्चार करण्यात येत असून सर्व नियुक्ती प्राधिका-यांचे संबंधित आदेशांकडे काटेकोर अंमलबजावणीसाठी लक्ष वेधण्यात येत आहे. या संदर्भात खालील उदाहरणात स्पष्टीकरण दर्शविले आहे.

उदा. १०० बिंदु नामावलीनुसार १७ जागा भरताना बिंदु क्रमांक-२२ ते ३८ हे वापरावयाचे आहेत. ह्यानुसार खुला प्रवर्ग व मागासवर्गीयांच्या आरक्षित जागांचे वाटप पुढीलप्रमाणे येईल :-

| | | |
|---|---|---|
| खुला प्रवर्ग | ११ | |
| अनुसूचित जाती | २ | [बिंदु क्रमांक २५ व ३३] |
| अनुसूचित जमाती | १ | [बिंदु क्रमांक ३०] |
| विमुक्त जाती, भटक्या जमाती | १ | [बिंदु क्रमांक २८] |
| इतर मागासवर्गीय | २ | [बिंदु क्रमांक २४ व ३४] |
| एकूण: | १७ | |

या एकूण भरावयाच्या १७ जागांपैकी ६ जागा मागासवर्गीयांसाठी आरक्षित आहेत. या ६ आरक्षित जागांसाठी गुणवत्ता शिथिल करून जे उमेदवार

GR-200404081626450001-0100

कृ. मा. प.

शा. म. मु. रोटा/सा. प्र. वि. /एच-११३४[३०००-२-९१]

निवडलेले आहेत त्यांचा विचार करावा लागेल. ६ आरक्षित जागांव्यतिरिक्त जे काही मागासवर्गीय उमेदवार गुणवत्तेनुसार निवड झाले असतील त्यांना खुल्या प्रवर्गाच्या ज्या ११ जागा आहेत त्या संदर्भात त्यांचा गुणामुळे विचार करावा लागेल.

३. वरील आदेशांचे शासकीय व निम-शासकीय सेवांमधील सर्व नियुक्ती अधिका-यांनी काटेकोरपणे पालन करावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

प्र. ध. माळवे,
उप सचिव,
महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,
मुख्य मंत्री यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* आयुक्त, अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती, नवी दिल्ली,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ न्याय शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
संचालक, समाजकल्याण, पुणे,
सेवायोजन संचालक, नवी मुंबई,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय विभागांखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग,
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालयाचे इतर सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन १२, १३-अ, १४-अ,
निवड नस्ती.

---

* पत्राने.